**राज्यातील स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांमध्ये आर्थिकदृष्ट्या दुर्बल विद्यार्थ्यांना शैक्षणिक शुल्कातून सवलत देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२२/प्र.क्र.९१/विशि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२.
दिनांक : २२ जून, २०२३.

**प्रस्तावना** :-

राज्यात उच्च शिक्षणाचा विकास व अभिवृद्धी करण्यासाठी स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांची स्थापना करण्यात येते. या विद्यापीठांमधे शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना कोणत्याही शैक्षणिक शुल्क सवलती शासनाकडून देण्यात येत नाहीत. स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांमध्ये तुलनात्मकदृष्ट्या दिल्या जाणाऱ्या शैक्षणिक सुविधा व त्याअनुषंगाने आकारण्यात येणारे शुल्क विचारात घेता, आर्थिकदृष्ट्या दुर्बल असणाऱ्या विद्यार्थ्यांना स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांमध्ये प्रवेश घेतेवेळी आकारण्यात येणारे शुल्क भरणे अडचणीचे होते. या पार्श्वभूमीवर राज्यातील स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांमध्ये आर्थिकदृष्ट्या दुर्बल विद्यार्थ्यांना शैक्षणिक शुल्कातून सवलत देण्याबाबत विनंती शासनास प्राप्त झाली होती. यासंबंधित सर्व घटकांचा विचार करुन तसेच नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरणांतील विद्यार्थी केंद्रित शिक्षण प्रणालीची आवश्यकता विचारात घेऊन यासंदर्भात शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय**:-

राज्यात सर्व स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठामध्ये प्रवेश घेतलेल्या विद्यार्थी संख्येच्या एकूण १० टक्के इतक्या विद्यार्थ्यांसाठी, जे शासनाच्या निकषानुसार आर्थिक दुर्बल आहेत, अशा विद्यार्थ्यांना जात प्रवर्ग विचारात न घेता गुणवत्तेनुसार शैक्षणिक शुल्कामध्ये ५० टक्के सूट संबंधित स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाकडून देण्यात येईल. याव्यतिरिक्त आर्थिक दुर्बल किंवा अन्य निकषांच्या आधारे उर्वरित विद्यार्थ्यांना शैक्षणिक शुल्कातून सूट द्यावयाची असल्यास त्याबाबतचा निर्णय संबंधित विद्यापीठाच्या स्तरावर घेण्यात येईल.

२. सदर शैक्षणिक शुल्कामध्ये विद्यापीठ कोणत्याही नावाने आकारत असलेल्या सर्व शुल्कांचा समावेश असेल आणि ही सवलत संबंधित अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतल्यापासून अभ्यासक्रम पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीसाठी लागू राहील. यासंदर्भात स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठास शासनाकडून कोणतेही अनुदान किंवा इतर वित्तीय सहाय्य मिळणार नाही.

३. वरीलप्रमाणे शैक्षणिक शुल्कामध्ये सूट देण्याबाबतची प्रक्रिया ही विद्यार्थ्यांच्या प्रत्यक्ष प्रवेशावेळीच संबंधित स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाने अंमलात आणवावयाची आहे. प्रवेश प्रक्रियेच्या अंतिम तारखेपासून एक महिन्याच्या आत याबाबतचा अहवाल संबंधित सवलत देण्यात आलेल्या विद्यार्थ्यांच्या तपशीलासह स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ शासनास सादर करेल. तद्नंतर एक महिन्यात शासन स्तरावर याबाबत आढावा घेण्यात येईल. सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील.

४. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२२१६२७५४५३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

AJIT DATTATRAYA KATKAR

Digitally signed by AJIT DATTATRAYA KATKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=6ab66d3253a5332c701bb9922697b252de2300d3e9cfe0b93c88e8c299b219a8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1DAE81E2CCBD6C60BC3D691080DEA5E5428071B91ADE593F8D918786037CB6A1, cn=AJIT DATTATRAYA KATKAR
Date: 2023.06.22 16:30:00 +05'30'

(अजित काटकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ, मुंबई.
५. मा.मंत्री (उ.व तं.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
७. मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. सर्व स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांचे कुलगुरु.
९. सर्व स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांचे कुलसचिव.
१०.मा. प्रधान सचिव यांचे स्वीय सहायक, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती विशि-४.